महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील संवर्गात असलेल्या विविध पदांना समान स्वरुपाची पदनामे विहित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सेवाप्र-१०९९ / प्र. क्र. ७७ / कोषा- ३ अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १ एप्रिल, २०००

वाचा : शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : सेवाप्र-१०९१ / प्र.क्र.५२ / कोषा-३अ,
दिनांक : ८ सप्टेंबर, १९९४.

मंत्रालयीन विभाग आणि त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील पदांच्या पदनामांमध्ये सुसुत्रता व समानता असण्याची आवश्यकता विचारात घेऊन संदर्भाधीन शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : सेवाप्र-१०९१/प्र.क्र.५२/कोषा-३अ, दि.८ सप्टेंबर, १९९४ अन्वये या पदांना सुधारीत पदनामे विहित करण्यात आली आहेत. तथापि सदर पदांची पदनामे सुधारीत केल्यानंतरदेखिल ब-याच विभागांकडून / कार्यालयांकडून सदर सुधारीत पदनामांमध्ये बदल करण्याबाबतचे प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. त्याचप्रमाणे ज्या पदांना उपरोक्त शासन निर्णयान्वये सुधारीत पदनाम विहित करण्यात आलेले नाही, अशा पदांचे प्रस्तावदेखिल प्राप्त झालेले आहेत. उक्त शासन निर्णय तसेच प्राप्त झालेले प्रस्ताव याबाबतचा सर्वकष विचार करुन महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील प्रत्येक संवर्गातील पदांसाठी एकच पदनाम विहित करुन सदर पदे ही केवळ महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील आहेत व ती शासनाच्या इतर विविध सेवेतील पदाहून भिन्न स्वरुपाची असावीत यासाठी सदर पदांना सुधारीत पदनामे विहित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## **शासन निर्णय**

शासन आता असा आदेश देत आहे की, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:सेवाप्र-१०९१ / प्र.क्र.५२ / कोषा-३अ, दिनांक : ८ सप्टेंबर, १९९४ अन्वये देण्यात आलेले आदेश रद्द करुन मंत्रालयीन विभाग आणि त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवर असलेल्या ज्या पदांवर महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील संचालक, सह संचालक तसेच गट -"अ" (वरिष्ठ), गट - "अ" (कनिष्ठ), गट - "ब" या राजपत्रित व महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा गट - "ब" या अराजपत्रित संवर्गातील सध्याची पदनामे पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहेत.

| संवर्ग व वेतनश्रेणी | | सुधारीत पदनाम |
|---|---|---|
| १. संचालक<br>( १६,४०० -४५० -२०,००० ) | : | संचालक |
| २. सहसंचालक<br>( १२,००० - ३७५ - १६,५०० ) | : | सहसंचालक / मुख्य लेखा परीक्षक / अधिदान व लेखा अधिकारी |

| | | |
|---|---|---|
| ३. म.वि.व ले.से.गट - "अ" (वरिष्ठ)<br>( १०,६५० -३२५ - १५,८५० ) | : | उपसंचालक / अपर मुख्य लेखा अधिकारी /<br>मुख्य लेखा व वित्त अधिकारी /<br>उपमुख्य लेखा परीक्षक ( वरिष्ठ ) |
| ४. म.वि.व ले.से.गट - "अ" (कनिष्ठ)<br>(८,००० -२७५ -१३,५०० ) | : | सहायक संचालक / कोषागार अधिकारी /<br>उपमुख्य लेखा परीक्षक ( कनिष्ठ ) |
| ५. म.वि.व ले.से. गट - "ब<br>(६,५०० - २०० - १०,५०० ) | : | लेखा अधिकारी / अपर कोषागार<br>अधिकारी / लेखा परीक्षा अधिकारी |
| ६. म.वि.व ले.से.गट - "ब" (अराजपत्रित<br>( ५,५०० - १७५ - ९,००० ) | : | सहायक लेखा अधिकारी / उपकोषागार<br>अधिकारी / सहायक लेखा परीक्षा अधिकारी |

२. वरील पदनामांची सुधारणा केवळ प्रशासकीय सुसुत्रतेच्या दृष्टीने करण्यात येत असल्याने या सुधारणेमुळे संबंधित पदांची विद्यमान वेतनश्रेणी / कर्तव्ये आणि जबाबदा-या यामध्ये कोणताही बदल होणार नाही.

३. सर्व संबंधित विभागांना विनंती करण्यात येते की, आपल्या कार्यालयातील तथा आपल्या नियंत्रणाखालील ( दुय्यम कार्यालयास) कार्यालयांच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांच्या पदस्थापनेकरीता निर्माण केलेल्या पदांची पदनामे वरीलप्रमाणे सुधारीत करावीत. तसेच या पदांपैकी जी पदे हंगामी स्वरुपाची असतील ती पदे पुढे चालू ठेवताना सुधारीत पदनामाने चालू ठेवण्याची कार्यवाही करावी. तसेच आपल्या विभागाच्या व आपल्या विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवर महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील नवीन पदे निर्माण करताना अशी पदे वरील पदनामानेच निर्माण करावीत.

४. संबंधित विभागांना / कार्यालयांना प्रस्तुतप्रमाणे पदनामे सुधारीत करणे गैरसोईचे होणार असेल अशा विभागांनी / कार्यालयांनी वरीलप्रमाणे सुधारीत पदनामाच्या पुढे कंसात संबंधित पदांच्या कर्तव्यानुसार उपनाम द्यावे., तथापि, या संवर्गातील पदनामाशी समान पदनाम वेगळया संवर्गात असेल अशा कार्यालयात वरील पदनामापुढे त्या पदाचा (म.वि. व ले.से.) संवर्ग कंसात दर्शविण्यात यावा. ५. संबंधित विभागांनी त्यांच्या आस्थापनेवरील पदांची पदनामे सुधारीत करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करुन संबंधितांना कळवावे व याबाबतच्या आदेशाची प्रत वित्त विभाग तसेच संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, यांना अग्रेषित करावी.

६. हे आदेश, सामान्य प्रशासन विभाग, अनौ. संदर्भ क्रमांकः १५५६ / बारा, दि.२२.२.२००० अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहि --

( वि. प्र. कुळकर्णी )
शासनाचे उपसचिव

प्रत

महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा परीक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर

महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग ( पत्राने)
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव ( लेखा व कोषागारे), मंत्रालय, मुंबई
सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई-४०० ०२१
अधिदान लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे
विभागीय आयुक्त, पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती / कोकण विभाग.
विभागीय उपसंचालक, पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती / कोकण विभाग
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन
उपमुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती / नवी मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी / उपकोषागार अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सामान्य प्रशासन विभाग, (का. १२ ), मंत्रालय, मुंबई
वित्त विभागातील सर्व व्यय कार्यासने
अवर सचिव (प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कोषागार कार्यासने, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती ( कोषा-३ अ)